राष्ट्रीय स्तरावरील शालेय क्रीडा स्पर्धेत सहभाग/प्राविण्य मिळविणाऱ्या राज्यातील खेळाडूंना शिष्यवृत्ती देण्यासाठी निधी वितरित करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : क्रीडायो-३३२५/प्र.क्र.१९/ क्रीयुसे-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२५

**वाचा-**

१) शासन निर्णय क्र.समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.पीएचई-२१८४/३५६८/(९२) एसवायएस, दि.२८.११.१९८४
२) शासन निर्णय क्र.समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.पीएचई-१०९३/प्र.क्र.१४८/क्रीयुसे-१, दि.२८.११.१९९५
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.अताप्र-१००८/प्र.क्र.४२८/०८/क्रीयुसे-२, दि.२२.०३.२०१०
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.राक्रीधो-२०१२/प्र.क्र.१४५/१२/क्रीयुसे-२, दि.०४.०७.२०१३
५) सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/शाक्रीस्प/शिष्यवृत्ती/२०२३-२४/का-४/४०९७, दि.२४.०१.२०२५

**प्रस्तावना-**

राज्यात तालुका ते राष्ट्रीय स्तरावर भारतीय शालेय खेल महासंघ यांच्यावतीने शालेय खेल स्पर्धा, तसेच भारतीय क्रीडा प्राधिकरणाच्या महिला व ग्रामीण (पायका) क्रीडा स्पर्धा यांचे आयोजन क्रीडा व युवकसेवा संचालनालय करते

सद्य:स्थितीत राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावरील स्पर्धामध्ये प्राविण्य (प्रथम, द्वितीय, तृतीय क्रमांक प्राप्त) मिळविलेल्या व सहभागी खेळाडूंना संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयानुसार वार्षिक शिष्यवृत्ती दिली जाते. भारतीय शालेय खेळ महासंघ दिल्ली, जवाहरलाल नेहरु हॉकी टुर्नामेंट सोसायटी, दिल्ली व सुब्रोतो मुखर्जी स्पोर्टस एज्युकेशन सोसायटी दिल्ली यांच्या द्वारा सन २०२४-२०२५ मध्ये आयोजित राष्ट्रीय स्तरावरील विविध क्रीडा स्पर्धेत राज्यातील सहभाग/प्राविण्य मिळविणाऱ्या खेळाडूंना शिष्यवृत्ती करिता निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

सन २०२४-२५ मध्ये राष्ट्रीय शालेय क्रीडा स्पर्धेतील सहभाग/प्राविण्य मिळविणाऱ्या राज्यातील खेळाडूंना शिष्यवृत्ती देण्यासाठी मागणी क्र. ई-३, २२०४-क्रीडा व युवकसेवा-१०४- क्रीडा व खेळ (०९) (०१) क्रीडा नैपुण्य शिष्यवृत्त्या ३४ शिष्यवृत्त्या/विद्यावेतने (२२०४-१६६७) योजनेतर या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध झालेल्या तरतुदीमधून

रू. १,६९,०३,४५०/- (रू.एक कोटी एकोणसत्तर लक्ष तीन हजार चारशे पंन्नास फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

ii. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी/उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे तसेच संबधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२४/१४७१, दि.२०.०३.२०२५ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौस. क्र.४९३/व्यय -५, दि. २७.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०२५०३२९१६०७४१००२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by ASHOK HANMANLU DAMAYYAWAR
Date: 2025.03.29 16:09:19 +05'30'

**( अशोक ह. दमय्यावार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री, (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
४. मा. उपमुख्यमंत्री, (नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
५. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन , मुंबई
६. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन , मुंबई
७. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, मुंबई.

९. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
१०.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
११.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१५.महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१६.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत )
१८. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे . (क्रीडा संचालनालयामार्फत)
१९.लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
२०.सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
२१.वित्त विभाग,व्यय -५ /अर्थ -८, नियोजन विभाग (का. १४७१ ) मंत्रालय, मुंबई,
२२.अवर सचिव, अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३.निवड नस्ती (क्रीयुसे-२).